**नाशिक महात्मानगरच्या पंडया हॉस्पीटलमधील डॉक्टरांच्या गैरकारभार, हलगर्जीपणा आदी संदर्भात तक्रारी असून त्या तक्रारीकडे दुर्लक्ष करणाऱ्या वैद्यकीय अधिकाऱ्यांची चौकशी करण्याकरिता समिती गठीत करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः विपल ३६२५/२७/ई.ऑ.क्र.१०३६३०७/प्र.क्र.२२/कु.क.**
१० वा मजला, बी विंग, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत
नवीन मंत्रालय, लो.टि. मार्ग, मुंबई- ४०० ००१
दिनांक : २२ एप्रिल, २०२५

**प्रस्तावना -**

डॉ. (श्रीमती) मनिषा कायंदे, वि. प.स. यांनी महाराष्ट्र विधानपरिषद नियम १०१ अन्वये लक्षवेधी सूचना क्र. ६३४ अन्वये, नाशिक महात्मानगरच्या पंडया हॉस्पीटलमधील डॉक्टरांच्या गैरकारभार, हलगर्जीपणा आदी संदर्भात तक्रारी असून अशा डॉक्टरांना तत्काळ निलंबित अथवा बदली करावी व त्यांची चौकशी करण्याची मागणी केलेली आहे. विधिमंडळामध्ये वरील लक्षवेधीच्या निवेदनावर मा. मंत्री महोदयांनी "डॉ. चव्हाण व डॉ. शेटे यांनी केलेल्या चुका अक्षम्य आहे. त्याबद्दल त्यांची तात्काळ बदली आणि १५ दिवसांमध्ये आयुक्तांच्या अध्यक्षतेखाली चौकशी समिती नेमून त्यांच्यावर कडक कारवाई किंबहुना आवश्यक कारवाई करण्यात येईल" असे विधानमंडळास आश्वस्त केले आहे. त्यानुसार समिती गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

उपरोक्त नमूद केल्याप्रमाणे नाशिक महात्मा नगर येथील पंडया हॉस्पिटल हे नोंदणी शिवाय विना परवाना सुरु असणे आणि त्याकडे नाशिक महानगरपालिकेमधील वैद्यकीय आरोग्य अधिकारी यांनी दुर्लक्ष करणे इत्यादी बाबीच्या अनुषंगाने चौकशी करण्याकरिता आयुक्त, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई यांच्या अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे चौकशी समिती गठीत करण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदनाम | |
|---|---|---|
| १ | आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई | अध्यक्ष |
| २ | संचालक, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई | सदस्य |
| ३ | सह संचालक (रुग्णालय राज्यस्तर) आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई | सदस्य |
| ४ | अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे | सदस्य |
| ५ | उप संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालया, पुणे | सदस्य सचिव |

२. समितीची कार्यकक्षा - सदर समितीने पंडया हॉस्पीटल, नाशिक या हॉस्पीटलकडे मुंबई शुश्रुषागृह नोंदणी अधिनियम, १९४९ वैद्यकीय गर्भपात अधिनियम, १९७१ अन्वये वा अन्य अधिनियमान्वये मंजूरी नसतांना अवैघ गर्भपात करणे, मागासवर्गीय महिला व नवजात अर्भकाचा मृत्यू होणे इ. बाबत तत्काळ कारवाई करण्याऐवजी त्याकडे दूर्लक्ष करणे, आयुक्तांकडे अहवाल सादर न करणे इ. च्या अनुषंगाने या प्रकरणाची चौकशी करुन अहवाल शासनास सादर करणे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०४२२११३३५५२८१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VAIBHAV GAJANAN KOSHTI

Digitally signed by VAIBHAV GAJANAN KOSHTI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=5749df8e46703e97e25555afe696d0a51badfa2373ccdc83593e18af18e92f1a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=47C0ABB5437C6B09C621CCA6C499475684F37EA0F5529DD3EF3D6E6B3326E747, cn=VAIBHAV GAJANAN KOSHTI
Date: 2025.04.22 11:52:57 +05'30'

**( वैभव ग. कोष्टी )**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. मा. मंत्री, सा.आ. व कु.क. यांचे खाजगी सचिव.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक (मुंबई व पुणे), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. सहसंचालक (रुग्णालय-राज्यस्तर), आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
६. उप संचालक, आरोग्य सेवा राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
७. जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय, नाशिक.
८. मुख्य प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
९. सचिव-१, सार्वजनिक आरोग्य व कुटुंब कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक.
१०. निवड नस्ती (कु.क.).